नक्षलग्रस्त आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील गावात नक्षलवादयांना गावबंदी योजना लागू करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक एनएएक्स ११०९/प्र क्र ६२९/विशा-१ब
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- १८ मार्च, २०११

**वाचा :-** शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमांक ग्रापप्रो २००६/प्र.क्र. ६१/का-१४ दिनांक २६.१२.२००६

**प्रस्तावाना :-** नक्षल चळवळीस आळा घालण्याच्या दृष्टीने संदर्भाधिन दिनांक २६.१२.२००६ च्या शासन निर्णयाद्वारे नक्षलग्रस्त भागातील आदिवासी क्षेत्रातील गावांमध्ये नक्षलवादयांना गावबंदी ही योजना लागू करण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर बिगर आदिवासी क्षेत्रातील गांवामध्ये नक्षलवादयांना गावबंदी योजना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्याबाबत मंत्रिमंडळाने पुढीलप्रमाणे निर्णय दिनांक १८ फेब्रुवारी, २००८ च्या बैठकीत घेतला आहे.

**शासन निर्णय :-** आदिवासी विकास विभागाकडून नक्षलग्रस्त आदिवासी क्षेत्रासाठी लागू केलेल्या नक्षलवादयांना गावबंदी या योजनेच्या धर्तीवरच नक्षलग्रस्त बिगर आदिवासी क्षेत्रात सुध्दा नक्षलवादयांना गावबंदी करण्याची योजना या आदेशाद्वारे सन २०१०-११ या वर्षापासून लागू करण्यात येत आहे.

२. या योजनेनुसार नक्षलग्रस्त बिगर आदिवासी क्षेत्रातील ज्या गावांनी पुढाकार घेवून नक्षलवादयांना गांवबंदी केली आहे, अशा गांवाना प्रत्येकी रुपये ३.०० लक्ष एवढा निधी त्या गावांच्या विकासात्मक कामासाठी प्रोत्साहानात्मक अनुदान म्हणून मंजूर होईल. सदर निधी संबंधित गावच्या ग्रामपंचायतीस सबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी, यांचेमार्फत वितरित करण्यात येईल. हा निधी संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यात येईल. त्यांनी तो सबंधीत यंत्रणेला वितरित करावयाचा आहे.

३. या योजनेनुसार नक्षलग्रस्त बिगर आदिवासी क्षेत्रातील ज्या गावांनी नक्षलवाद्यांना गावबंदी केली असेल ती गावे अनुदानास या योजनेंतर्गत पात्र रहतील

४. नक्षलग्रस्त आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील नक्षलवादयांना गावबंदी केली असेल त्या गावास मंजूर होणारा निधी त्या गावाने कशा प्रकारे खर्च करावयाचा या बाबतची मार्गदर्शक तत्वे सोबतच्या परिशिष्ट अ मध्ये दिलेली आहेत. त्या मार्गदर्शक तत्वास अनुसरुनच सदर निधी खर्च करण्यात यावा.

५. या योजनेकरिता मंजूर करण्यात येणारा निधी विहित मुदतीत संपूर्णत: खर्च होईल, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी घ्यावी.

६. योजनेसाठी आवश्यक खर्च नियोजन विभागाने जिल्हाधिकारी यांना ग्रामभेट योजनेसाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून करण्यात यावा. तसेच निधीची मागणी आवश्यकतेनुसार जिल्हाधिकारी यांनी नियोजन विभागाकडे करावी.

७. या योजनेखाली मंजूर करण्यात येणारा निधी नियोजन विभागाच्या मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९० सचिवालय (०१) नियोजन विभाग, (०४)(०१) नक्षलग्रस्त भागासाठी विशेष कृतिदल, ३१ सहायक अनुदान ३४५१०३५४ (योजनांतर्गत) या लेखाशीर्षाखाली खर्ची दर्शविण्यात यावा.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमाक ३६/११/ व्यय-८ दिनांक ०५.०२.२०११ अन्वये दिलेल्या मान्यतेने व नियोजन विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०३१७२०४०५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

( दत्तात्रय बो-हाडे )
शासनाचे अवर सचिव.

**सोबत:- परिशिष्ट अ**

प्रत :-

मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
जिल्हाधिकारी, गडचिरोली / चंद्रपूर / भंडारा / गोंदिया/यवतमाळ/ नांदेड
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली / चंद्रपूर / भंडारा / गोंदिया/यवतमाळ/ व नांदेड
पोलीस अधीक्षक, गडचिरोली / चंद्रपूर / भंडारा / गोंदिया/यवतमाळ/ नांदेड
महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, मुंबई/ नागपूर
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ / २, मुंबई/ नागपूर
संह संचालक, लेखा व कोषागरे, संगणकीय कक्ष नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालय, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी , गडचिरोली /चंद्रपूर / भंडारा / गोंदिया/यवतमाळ/नांदेड
वित्त विभाग (व्यव-८) मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती (विशा-१ब)

## परिशिष्ट अ
## ( शासन निर्णय क्रमांक एनएएक्स ११०९/प्र क ६२९/विशा-१ब दिनांक १८ मार्च , २०११ सोबतचे )

**नक्षलवादयांना गावबंदी केलेल्या गावांना मंजूर केलेला प्रोत्साहानात्मक निधी खर्च करण्याबाबत मार्गदर्शक सूचना**

१) ही योजना, नक्षलग्रस्त भागातील आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रातील बिगर आदिवासी गावांसाठी लागू राहील. त्यासाठी संबंधित ग्रामपंचायत व ग्रामसभेने ठराव करणे आवश्यक राहील. तो ठराव त्यांनी पोलीस अधिक्षक, मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद व जिल्हाधिकारी यांना पाठविणे आवश्यक राहील.

२) गावबंदी योजनेच्या अंमलबजावणीबाबत जिल्हा पोलीस अधिक्षकांनी यांचा अहवाल आपल्या शिफारशीसह जिल्हाधिकारी यांचेमार्फत विभागीय आयुक्त, नागपूर यांना पाठविणे आवश्यक राहील.

३) ग्रामपंचायत व ग्रामसभेचे ठराव व पोलीस अधिक्षक आणि जिल्हाधिकारी यांची शिफारस विचारात घेऊन मुख्य कार्यकारी अधिकारी अनुदान पात्र गावे निश्चित करतील व जिल्हाधिकारी यांना कळवतील. त्यानुसार जिल्हाधिकारी त्या गांवाना प्रत्येकी रुपये ३ लक्ष अनुदान एकाच हप्त्यात मंजूर करुन ते संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्यामार्फत संबंधित ग्रामपंचायतीस अदा करतील.

४) विकासात्मक कामे ग्रामपंचायतीमार्फत करुन घेण्यात येतील. त्यासाठी रुपये तीन लाखापेक्षा अधिक अनुदान दिले जाणार नाही.

५) विकासाची कामे व त्यांचे स्वरुप ग्रामसभेने निश्चित करावे. या विकासकामामध्ये लहान पाणीपुरवठा योजना, विहिर खणणे, अंगणवाडी खोली बांधकाम /दुरुस्ती, पिण्याच्या पाण्यासाठी पाईपलाईन टाकणे, पाणवठा तयार करणे, व्यायामशाळा बांधणे इ. कामाचा समावेश असावा.

६) योजनेचे नियंत्रण संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी करतील. निधी अंशत:/ पुर्णत: अखर्चित राहिल्यास तो संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे परत करणे आवश्यक राहील.

७) विकासात्मक कामाचा अहवाल मुख्य कार्यकारी अधिकारी प्राप्त करुन घेवून तो व निधी उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी यांच्यामार्फत विभागीय आयुक्त, नागपूर यांना सादर करतील. विभागीय आयुक्त, नागपूर अंतिम एकत्रित अहवाल व निधी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करतील.

**************